**अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या स्वयंसहायता बचत गट योजनेसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-माविम-२०१७/प्र.क्र.६७/का-९**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दि. २३ मे, २०१७.

**<u>वाचा:-</u>** (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र. ७५/अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७.

(२) महाव्यवस्थापक, (वित्त व प्रशा.), महिला आर्थिक विकास महामंडळ यांचे पत्र क्र.माविम/लेखा/२०१७/०५, दि. १० एप्रिल, २०१७.

**<u>प्रस्तावना</u>**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमूहातील महिलांच्या आर्थिक सक्षमीकरणासाठी त्यांना संघटीत करून पुरेसा पतपुरवठा उपलब्ध करून देणे व त्यांना उद्योजकतेविषयक आवश्यक असलेली माहिती देऊन त्यांच्यामध्ये उद्योजकीय कौशल्ये विकसित करण्याच्या हेतूने अल्पसंख्याक लोकसमूहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या अंतर्गत पहिल्या टप्प्यात मुंबई शहर, मुंबई उपनगर, नांदेड, मालेगांव, कारंजा, परभणी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, भिवंडी, मुंब्रा-कौसा आणि मिरज येथे अल्पसंख्याक लोक समुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत अल्पसंख्याक महिलांचे २४०० बचत गट निर्माण करून त्यांचे १३ लोकसंचलित साधन केंद्र ८ वर्षाच्या कालावधीत उभी राहणार आहेत. या करीता रु.२७,५४,३२,६३९ /- (अक्षरी रू.सत्तावीस कोटी चोपन्न लक्ष बत्तीस हजार सहाशे एकोणचाळीस फक्त) इतक्या अपेक्षित खर्चास मान्यता देण्यात आली आहे. ही योजना महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत राबविण्यात येत आहे. या योजनेसाठी सन २०१७-१८ या वर्षात अंमलबजावणीसाठी रू. २.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ करिता सदर अर्थसंकल्पित निधीच्या ८० % निधी वितरीत करण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ करिता रू. १,६०,००,०००/- ( अक्षरी रू. एक कोटी साठ लक्ष फक्त ) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. महिला आर्थिक विकास महामंडळाने त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील दि.१० एप्रिल, २०१७

रोजीच्या पत्रान्वये निधी मिळण्याबाबत मागणी केली आहे. त्यानुसार निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात “स्वयंसहाय्य गटाकरिता सहायक अनुदान” या योजनेसाठी अर्थसंकल्पित एकूण रू. २,००,००,०००/- ( अक्षरी रू. दोन कोटी फक्त) निधीपैकी माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ करिता ८० टक्के च्या मर्यादेत रू. १,६०,००,०००/- ( अक्षरी रू. एक कोटी साठ लक्ष फक्त) एवढा निधी महिला आर्थिक विकास महामंडळाला वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर रकमेचा Electronic Clearing Service (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावे काढण्यात यावा.

३. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहील. प्रस्तुत प्रकरणी सदर रक्कम आहरीत करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग नियंत्रण अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. यासाठी होणारा खर्च सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. झेडई-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१०) स्वयंसहाय्य गटाकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १६९), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत याबाबतच्या वर्षनिहाय खर्चाचा लेखाविषयक तपशिल ठेवावा, ज्या बाबींसाठी अनुदान वितरीत करण्यात आले आहे त्याबाबींवरच खर्च करण्यात यावे. तसेच सदर बाबींचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

६. “ सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७ मधील परिच्छेद ७ ते १८ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अ.क्र. ३ व ९ मधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. ”

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२३१४११३१८५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MINORITY DEVELOPMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bcd09896471a6f90b80581ca42d45e27f07ad7e99a45bec3a7579cf10330fcd, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2017.05.23 14:20:30 +05'30'

**(अशोक गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१२) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
१३) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वफ्क महामंडळ, औरंगाबाद,
१५) कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई,
१६) अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई,
१७) कक्ष अधिकारी (का. ७ व ८), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवडनस्ती (कार्यासन-९)